**महानगरपालिका क्षेत्रातील सार्वजनिक सुविधा / प्रयोजनासाठी आरक्षित शासकीय जमिनीचा आगाऊ ताबा / जमीन संरक्षणार्थ महानगरपालिकेकडे सोपविण्याचे अधिकार जिल्हाधिकाऱ्यांना प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
शासन परिपत्रक क्रमांक : जमीन ०७/२०१०/प्र.क्र.९९/ज-१
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १८ सप्टेंबर, २०१०.

वाचा:- शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. जमीन १०/२००५/प्र.क्र.३८/ज-१, दि.७.३.२००६

**शासन परिपत्रक :**

विविध प्रयोजनासाठी शासकीय जमिनीच्या मंजूरीची कार्यवाही पूर्ण होण्यासाठी लागणाऱ्या कालावधीमुळे महत्वाच्या योजनेच्या अंमलबजावणीस विलंब होऊ नये म्हणून काही अपवादात्मक प्रकरणात निर्बाधरित्या वाटपास उपलब्ध असलेल्या नगरपालिका / नगरपरिषद हद्दीतील शासकीय जमिनीचा आगावू ताबा देण्याचे अधिकार दि.७.३.२००६ च्या शासन निर्णयान्वये जिल्हाधिकारी यांना प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार जिल्हाधिकारी यांच्याकडून आगावू ताबा देण्यात येतो व वित्तीय अधिकारानुसार योग्य त्या स्तरावर रितसर जमीन मंजूरीचा प्रस्ताव सादर करण्यात येतो. प्रचलित धोरणामध्ये महानगरपालिका क्षेत्रातील शासकीय जमिनीचा आगावू ताबा देण्याचे अधिकार जिल्हाधिकाऱ्यांना नाहीत.

२. ठाणे जिल्ह्यातील अतिक्रमणे/अनधिकृत बांधकामांबाबत मा.उच्च न्यायालयात दाखल जनहीत याचिका क्र.१, ३५ व ३६/२००७ च्या अनुषंगाने मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली स्थापन उच्चस्तरीय समितीच्या दि.१८.६.२०१० रोजी झालेल्या बैठकीत, महानगरपालिका क्षेत्रातील विकास आराखडयात सार्वजनिक प्रयोजनार्थ आरक्षित जागांचा आगावू ताबा देण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांना नसल्यामुळे सदर जागा रितसर मंजूर होई पर्यंत त्यावर अतिक्रमण होते असा मुद्दा जिल्हाधिकारी यांनी मांडला. त्यानुषंगाने यासंदर्भात विचार करुन पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे-

(१) **शासनमान्य विकास आराखड्यात** (प्रारुप किंवा प्रस्तावित विकास आराखडा नव्हे) रस्ते, बगीचे, खेळाचे मैदान, उद्यान, पाणी पुरवठा, वीज पुरवठा, पथदीप, मलनिस्सारण, सांडपाणी, सार्वजनिक शौचालय, स्मशानभूमी, दफनभूमी या सार्वजनिक सुविधांसाठी (Public Convenience) आरक्षित असलेल्या **महानगर क्षेत्रातील** शासकीय जमिनींचा विनामुल्य आगावू ताबा संबंधित **महानगरपालिकेला** देण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांना राहतील.

(२) वर नमूद प्रयोजनाव्यतिरिक्त अन्य प्रयोजन सार्वजनिक सुविधेमध्ये (Public Convenience) मोडते किंवा नाही याबाबत शासनाची पूर्व मान्यता घेतल्याशिवाय आगावू ताबा देण्यात येऊ नये. मात्र तोपर्यंत सदर जमीन संरक्षणासाठी संबंधित महानगरपालिकेस सोपविण्यात यावी. सदर जमिनीचे अतिक्रमणापासून संरक्षण करण्याची जबाबदारी संबंधित महानगरपालिकेची राहील. मात्र, रितसर जमीन मंजूरी किंवा आगावू ताबा मिळाल्याशिवाय आरक्षित प्रयोजनासाठी वापर सुरु करता येणार नाही.

(३) वरील प्रयोजनाव्यतिरिक्त शासनमान्य विकास आराखड्यात किंवा प्रारुप/प्रस्तावित विकास आराखड्यात अन्य प्रयोजनासाठी आरक्षित असलेल्या शासकीय जमिनीचे **नियमानुसार योग्य ते मुल्य वसूल केल्यानंतरच** जमिनीचा आगावू ताबा देण्यात यावा. मात्र तोपर्यंत सदर जमीन संरक्षणासाठी संबंधित महानगरपालिकेस सोपविण्यात यावी. सदर जमिनीचे अतिक्रमणापासून संरक्षण करण्याची जबाबदारी संबंधित महानगरपालिकेची राहील. मात्र, रितसर जमीन मंजूरी किंवा आगावू ताबा मिळाल्याशिवाय आरक्षित प्रयोजनासाठी वापर सुरु करता येणार नाही.

(४) कोणत्याही प्रयोजनासाठी शासकीय जमिनीचा आगावू ताबा दिल्यानंतर आरक्षणात बदल झाल्यास नवीन आरक्षणाच्या अनुषंगाने वापर सुरु करण्यापूर्वी बदललेल्या आरक्षणानुसार सुधारीत दराने मुल्य भरणे व शासनाची परवानगी घेणे बंधनकारक राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००९१८१४३५०५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

*सही/-*

**( शिवाजी गोरे )**
**कार्यासन अधिकारी,**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
जमाबंदी आयुक्त व संचालक,भूमि अभिलेख,महाराष्ट्र राज्य,पुणे.
नोंदणी महानिरिक्षक व मुंद्राक नियंत्रक महाराष्ट्र राज्य, पुणे.
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा, महाराष्ट्र राज्य (१)मुंबई.
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा, महाराष्ट्र राज्य (२) नागपूर
मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.
मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.
अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे स्वीय सहाय्यक.
सर्व उपविभागीय अधिकारी
"ज" समुहातील सर्व कार्यासने/उपसचिव/सहसचिव, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई.
कार्यासन ज-१, महसूल व वन विभाग निवडनस्ती.